**<u>महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ</u>**
आहरण व संवितरण अधिकारी घोषित
करणे.

**महाराष्ट्र शासन**
मराठी भाषा विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : सासंमं-२०१७/प्र.क्र.९३/आस्था-२,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २९ ऑगस्ट,२०१७.

**वाचा :** १) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय, क्रमांक सासंस-२०१२/प्र.क्र.२३/२०१२/भाषा-१, दि. १८.०२.२०१२.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक सेवाप्र २०१६/प्र.क्र.६४/कोषा (प्रशा ३), दि. ०६.०१.२०१७.
३) महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाचे पत्र क्रमांक सासंमं२०१७/४२७१, दि. ०८.०८.२०१७.

**<u>शासन निर्णय</u>**

वरील संदर्भ (१) नुसार महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून मंडळाच्या सचिव श्रीमती मीनाक्षी रा. पाटील यांना घोषित करण्यात आले आहे. संदर्भ (२) अन्वये सहाय्यक लेखा अधिकारी यांना राजपत्रित दर्जा प्रदान करण्यात आला आहे. मंडळातील कामाच्या सोयीच्या दृष्टीने या निर्णयाच्या दिनांकापासून मंडळातील सहाय्यक लेखा अधिकारी यांना मुंबई वित्तीय नियम १९५९ च्या नियम २ (viii) आणि महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ च्या नियम २८९ नुसार आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

संदर्भ (१) नुसार कार्यालय प्रमुख तसेच नियंत्रण अधिकारी म्हणून मंडळाचे सचिव कार्यरत राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१७०८२९१२२९१५८३३३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nanda Maruti Raut
Digitally signed by Nanda Maruti Raut
Date: 2017.09.06 15:17:20 +05'30'

(नंदा. मा. राऊत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल -१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
३. सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (विनियम/व्यय-४/कोषा-प्रशा-५), मंत्रालय, मुंबई
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
७. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, प्रभादेवी, मुंबई
८. सर्व अवर सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सर्व कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती, आस्था-२, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई